**विविध योजनांच्या अभिसरणामधून "पालकमंत्री शेत/पाणंद रस्ते योजना"राबविणेबाबत (शुध्दीपत्रक).**

**महाराष्ट्र शासन,**
**नियोजन विभाग,रोहयो प्रभाग,**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक-रोहयो-२०१७/प्र.क्र.२७९/रोहयो-१०अ**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२,
दिनांक :-०६ फेब्रुवारी, २०१९.

वाचा:- १) शासन निर्णय क्रमांक-रोहयो-२०१७/प्र.क्र.२७९/रोहयो-१०अ, दिनांक २७ फेब्रुवारी,२०१८.
२) शासन निर्णय क्रमांक-रोहयो-२०१७/प्र.क्र.२७९/रोहयो-१०अ, दिनांक २५ मे,२०१८.
३) शासन शुध्दीपत्रक क्रमांक-रोहयो-२०१७/प्र.क्र.२७९/रोहयो-१०अ, दिनांक १२ ऑक्टोबर, २०१८.

**शासन शुध्दीपत्रक:-**

शासन निर्णय क्रमांक रोहयो-२०१७/प्र.क्र.२७९/रोहयो-१०अ, दिनांक २७ फेब्रुवारी,२०१८ अन्वये "पालकमंत्री शेत/पाणंद रस्ते योजना"राबविण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. तसेच शासन निर्णय क्रमांक रोहयो-२०१७/प्र.क्र.२७९/रोहयो-१०अ, दिनांक २५ मे,२०१८ अन्वये पालक मंत्री शेत/पाणंद रस्ते योजनेअंतर्गत "भाग-ब-शेत/पाणंद रस्ता अतिक्रमणमुक्त करुन कच्चा रस्ता तयार करणे"याबाबीकरिता जिल्हाधिकारी यांना एकूण रु.५१००.०० लक्ष (रुपये एक्कावन्न कोटी फक्त) इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

मा.मंत्री (रोहयो) यांच्या अध्यक्षतेखाली नेमण्यात आलेल्या राज्यस्तरीय समितीची बैठक मा.मंत्री (रोहयो) यांच्या मंत्रालयातील दालनात बुधवार, दिनांक २६ सप्टेंबर, २०१८ रोजी सकाळी ११.०० वाजता आयोजित करण्यात आली होती. त्याअनुषंगाने शासन शुध्दीपत्रक क्रमांक-रोहयो-२०१७/प्र.क्र.२७९/रोहयो-१०अ, दिनांक १२ ऑक्टोबर, २०१८ निर्गमित करण्यात आले आहे.तथापि, दि.२७ फेब्रुवारी,२०१८ च्या शासन निर्णयात पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे :-

१. परिच्छेद क्र.३(ब)**भाग-ब-शेत/पाणंद रस्ता अतिक्रमण मुक्त करुन कच्चा रस्ता तयार करणे.**ज्या ठिकाणी शेतक-याची सहमती आहे, अशा ठिकाणी अर्थमुव्हर उत्खनन यंत्राच्या साहाय्याने योग्य आखणी करुन दोन्ही बाजूने चर खोदून त्यामधून निघणारी माती/मुरुम शेत/पाणंद रस्त्यामधील भागात टाकण्यात यावी. तसेच चरात खोदून निघालेली माती/मुरुम योग्य प्रमाणात पसरवून रस्त्यांचा कच्चा भराव तयार करण्यात यावा. असा कच्चा रस्ता करण्याकरीता प्रति किलोमीटर जास्तीत जास्त रु.५०,०००/- इतका खर्च अनुज्ञेय राहील. यापेक्षा अतिरिक्त रक्कम असल्यास शेतक-यांनी लोकसहभागातून ती उत्खनन यंत्रधारकास परस्पर अदा करावी. लोकसहभागातून रक्कम उभारण्याकरीता सीएसआर/एनजीओ यांची मदत घेता येईल.

ऐवजी

“परिच्छेद क्र.३(ब)ज्या ठिकाणी शेतक-याची सहमती आहे, अशा ठिकाणी अर्थमुव्हर उत्खनन यंत्राच्या साहाय्याने योग्य आखणी करुन दोन्ही बाजूने चर खोदून त्यामधून निघणारी माती/मुरुम शेत/पाणंद रस्त्यामधील भागात टाकण्यात यावी. तसेच चरात खोदून निघालेली माती/मुरुम योग्य प्रमाणात पसरवून रस्त्यांचा कच्चा भराव तयार करण्यात यावा. **असा कच्चा रस्ता तयार करण्याकरीता टायर असलेले बॅकहो लोडर व एक्सकॅव्हेटर (७०HP पेक्षा अधिक क्षमता असलेले जेसीबी इत्यादी अर्थमूव्हर) या करीता १०० तास प्रति किलोमीटर व चेन असलेले एक्सकॅव्हेटर (२०० HP पेक्षा अधिक क्षमता असलेले पोकलेन इत्यादी अर्थमुव्हर) करीता ४० तास प्रति किलोमिटर अनुज्ञेय राहील.या पेक्षा प्रति किलोमिटर अधिक तास लागत असल्यास तालुकास्तरीय समितीची मान्यता आवश्यक राहील”**असे वाचावे.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१९०२०६१७३८०१५४१६ असा आहे. हे शासन शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपालयांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Eknath Rajaram Dawale
Date: 2019.02.07 12:42:28 +05'30'

**( एकनाथ डवले )**
सचिव (रोहयो)

**प्रत,**

१. मा.राज्यपालयांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
३. मा.मंत्री (रोहयो) यांचे खाजगी सचिव,
४. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५. मा.समिती प्रमुख,महाराष्ट्र विधानमंडळ रोहयो समिती,विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मुख्य सचिव यांचे सहसचिव
७. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधानसचिव/सचिव,मंत्रालयीन विभाग
८. सर्व विभागीय आयुक्त,
९. आयुक्त, नरेगा नागपूर.
१०.आयुक्त (कृषी), महाराष्ट्र राज्य, पुणे,
११.संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य,पुणे

१२.सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
१३.मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर), पुणे
१४.संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
१५.सर्व जिल्हाधिकारी,
१६.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१७.सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
१८. सर्व अधीक्षक अभियंता,पाटबंधारे/सर्व अधीक्षक अभियंता,लघु पाटबंधारे, (स्थानिकस्तर)
१९.संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२०.महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई (प्रसिध्दीकरीता)
२१.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
२२.सर्व उपायुक्त (विकास)
२३.महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर,
२४.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर,
२५.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२६.सर्व उपसचिव/सर्व अवर सचिव व सर्व कार्यासन अधिकारी,रोहयो
२७.सर्व मंत्रालयीन विभाग,
२८. निवडनस्ती रोहयो-१०अ.